**गौण वनोपज आधारभूत किंमत (MSP) माध्यमातून गौण वनोपज (MFP) विपणन आणि मुल्य साखळी विकास यंत्रणेसाठी राज्याच्या २५% हिश्श्यापोटी उपलब्ध केलेल्या निधीच्या विनियोगास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आविम-२०१४/प्र.क्र.१३१/का.-३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक: ३१ मार्च, २०१५.

**वाचा:-** १) शासन पत्र आदिवासी विकास विभाग क्र.- टिडीसी-१०१४/प्र.क्र.१९/का.३, दि. ६/३/२०१४.

२) भारत सरकार, जनजाती कार्य मंत्रालय नवी दिल्ली यांचे पत्र क्र.२/२१/२०१३-CP&R, दि. २४/३/२०१४.

**प्रस्तावना:-**

गौण वनोपज आधारभूत किंमत (MSP) माध्यमातून गौण वनोपज (MFP) विपणन आणि मुल्य साखळी विकास यंत्रणा या योजनेत केंद्र शासन व राज्य शासन यांचा हिस्सा अनुक्रमे ७५ : २५ या प्रमाणात राहणार आहे. केंद्र शासनाच्या जनजाती कार्य मंत्रालयाने संदर्भांकित क्र.२ च्या पत्रान्वये केंद्र शासनाच्या ७५% हिश्श्यापोटी रु.५००.०० लक्ष तरतूद महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळास वर्ग केलेली असल्याने राज्य शासनाच्या २५% हिश्श्यापोटी रु. १७८.४५ लक्ष इतका निधी पूरक मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर निधीच्या वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

गौण वनोपज आधारभूत किंमत (MSP) माध्यमातून गौण वनोपज (MFP) विपणन आणि मुल्य साखळी विकास यंत्रणेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाकडून ७५% केंद्र हिश्श्यापोटी रु. ५००.०० लक्ष निधी महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळास प्राप्त झालेला आहे. उक्त योजनेच्या अंमलबजावणीकरिता राज्य शासनाच्या २५% हिश्श्यापोटी पूरक मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या रु. १,७८,४५,०००/- रक्कमेपैकी रु.१,३३,८३,७५०/- (अक्षरी रुपये एक कोटी तेहतीस लक्ष त्र्याऐंशी हजार सातशे पन्नास फक्त) इतकी रक्कम खालीलप्रमाणे खर्च करण्यास या आदेशान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.:-

(रु.हजार)

| अ.क्र. | तपशील | रक्कम |
|---|---|---|
| १ | ६० खरेदी केंद्रांच्या आधुनिकीकरणासाठी | ५६२५.०० |
| २ | ५० मेट्रीक टन क्षमतेची ३४ साठवण गृह | २०७२.२५ |
| ३ | १० मध क्लस्टर | १०२७.५० |
| ४ | MFP खरेदी अनुषंगिक खर्च | ४६५९.०० |
| **एकूण** | | **१३३८३.७५** |

२. सदर तरतूद आगामी सहा महिन्यांच्या अवधीत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार खर्च करुन खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७४/अर्थ-१९, दि. ३१/३/२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०३३११२०१०२१८३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrashekhar J Deshpande

Digitally signed by Chandrashekhar J Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Chandrashekhar J Deshpande
Date: 2015.04.01 12:54:50 +05'30'

( चं.ज.देशपांडे )
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक.
३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.

६) वित्त विभाग (व्यय-१४/साऊ), मंत्रालय, मुंबई.

७) संचालक, लेखापरीक्षा, ऑफिस ऑफ दि डायरेक्टर, ऑडिट सायंटिफिक ॲन्ड कमर्शियल डिपार्टमेंट, १०१, महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२०.

८) कक्ष अधिकारी (कार्या-६) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) निवडनस्ती, कार्यासन-३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.